**राष्ट्रीय कृषि विकास योजना - कॅफेटेरिया अंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षा मधील अनुसूचित जाती व जमाती प्रवर्गाकरिता रु.२.५०३२ कोटी निधी मर्यादेचे वितरण करणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: राकृवि ०५२३ /प्र.क्र. ८९/१४-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०४२
दिनांक : ०४ जुलै, २०२३

संदर्भ :

१. केंद्रीय वित्त मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.1 (13)/PFMS/FCD/२०२०, दि.२३ मार्च,२०२१
२. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.राकृवि २०२२/प्र.क्र.६९/१४-अे, दि. २९ मार्च,२०२२.
३. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.राकृवि ०५२३/प्र.क्र.८९/१४-अे, दि. १५ मे,२०२३.
४. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.राकृवि ०५२३/प्र.क्र.८९/१४-अे, दि.३० मे,२०२३
५. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. जा.क्र.कृआ / राकृवियो /टि-१/०२३/भाग-३/१८३८१/२०२२-२३, दि.०१/०६/२०२३.
६. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. जा.क्र.कृआ /कृप्रवनि /राकृवियो /टि-३/११/१९७८८/२०२३, दि.१४/०६/२०२३.
७. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. जा.क्र.कृआ /कृप्रवनि /राकृवियो /टि-३/११/२०८३९/२०२३, दि.२१/०६/२०२३.

प्रस्तावना :

राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया ही केंद्र पुरस्कृत योजना केंद्र व राज्य शासनाच्या सहयोगाने अनुक्रमे ६०:४० या प्रमाणात अर्थसहाय्याने राबविण्यात येते. सदर योजनेच्या निधी व्यवस्थापनाकरिता सन २०२१-२२ पासून सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली कार्यान्वित झाली आहे. सदर प्रणालीवर राष्ट्रीय कृषि विकास योजनेकरिता आयुक्त (कृषि) स्तरावर Singal Nodal Account (SNA) व अंमलबजावणी यंत्रणांकरिता Zero Balance Account कार्यान्वित करण्यात आले आहेत.

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाच्या अखेरीस राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या SNA खात्यावर उपलब्ध निधीतून संदर्भ क्र. ३ व ४ येथील शासन निर्णयान्वये रु. ८६,१३,१९,५१७/-ची निधी मर्यादा अंमलबजावणी यंत्रणांना वितरीत करण्यात आली आहे. तसेच, संदर्भ क्र. ५ येथील आदेशान्वये रु.२.९३ कोटीची निधी मर्यादा कृषि आयुक्तालय स्तरावरुन वितरीत करण्यात आली आहे. सदर वितरणास कार्योत्तर मान्यता देण्याची विनंती संदर्भ क्र. ६ येथील कृषि आयुक्तालयाच्या प्रस्तावान्वये करण्यात आली आहे.

त्याचप्रमाणे अंमलबजावणी यंत्रणांकडून प्राप्त निधी मागणीनुसार अनुसूचित जाती/जमाती प्रवर्गाकरिता रु. २.५०३२ कोटी निधी मर्यादा वितरीत करण्याची विनंती कृषि आयुक्तालयाने संदर्भ क्र. ६ व ७ येथील प्रस्तावान्वये विनंती केली आहे.

कृषि आयुक्तालयाच्या उपरोक्त विनंतीच्या अनुषंगाने कार्योत्तर मंजूरी देण्याची व निधी मर्यादा वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याअनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णयः**

१. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत "शाश्वत कीड व्यवस्थापनासाठी जैवनियंत्रण एजंट्सचा वापर प्रदर्शित आणि लोकप्रिय करण्यासाठी बायोकंट्रोल उत्पादन प्रयोगशाळेची स्थापना, NRC डाळींब सोलापूर" या प्रकल्पास संदर्भ क्र. ५ अन्वये वितरीत करण्यात आलेल्या अनुसूचित जाती / जमाती प्रवर्गाच्या रु. २.९३ कोटी (रुपये दोन कोटी त्र्याण्णव लक्ष) निधी मर्यादेस या शासन निर्णयान्वये कार्योत्तर मान्यता देण्यात येत आहे.

२. राष्ट्रीय कृषि विकास योजना - कॅफेटेरिया या योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी अनुसूचित जाती / अनुसूचित जमाती प्रवर्गाकरिताची रु. २.५०३२ कोटी (रुपये दोन कोटी पन्नास लाख बत्तीस हजार फक्त) निधी मर्यादा या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत आहे. सदर वितरणाचा प्रकल्प निहाय /प्रवर्ग निहाय तपशील सोबत जोडलेल्या परिशिष्ट-अ मध्ये नमूद केला आहे.

३. आयुक्त (कृषि) यांनी उपरोक्त परिशिष्ट-अ अन्वये वितरीत निधी संबंधित अंमलबजावणी यंत्रणांस उपलब्ध करुन द्यावा.

४. राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी उपलब्ध होणाऱ्या निधीचा विनियोग करताना संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयातील सूचना / कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

५. या शासन निर्णयान्वये करण्यात आलेल्या निधी वितरणाच्या (निधी मर्यादा) अनुषंगाने आयुक्त (कृषि) यांनी प्रकल्पांच्या प्रगतीचा वेळोवेळी आढावा घेऊन प्रकल्पांच्या आवश्यकतेनुसार प्रकल्पांच्या निधी मर्यादेत त्यांच्या स्तरावर फेरबदल करावेत .

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७०४१८२९५४१८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सहपत्र :- परिशिष्ट - अ.**

SANTOSH BANSIRAO KARAD

Digitally signed by SANTOSH BANSIRAO KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=f981d5a9fec2e5d5dc36f39695b5f0e4ff5b340cd5420df7cbaa28990d692e36, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=90BBB9D3E7E74DE43F8070E2A9A65BFD42747F1995A4F22FDC0240939AAB0835, cn=SANTOSH BANSIRAO KARAD
Date: 2023.07.04 18:32:34 +05'30'

**(संतोष ब. कराड)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
२. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई,
३. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,

४. प्रधान सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. अ.मु.स. (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. महासंचालक, महाराष्ट्र राज्य कृषि शिक्षण व संशोधन परिषद, भांबुर्डा, भोसले नगर, पुणे.
८. संचालक (सर्व), कृषि आयुक्तालय, पुणे,
९. प्रधान महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर,
१०. प्रधान महालेखापाल - १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई / नागपूर,
११. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व),
१२. सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे,
१३. वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई,
१४. निवडनस्ती (का-१४-अे)

## परिशिष्ट - अ

## कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
## शासन निर्णय क्र. राकृवि ०५२३ /प्र.क्र. ८९/१४-अे, दि. ००४/०७/२०२३ चे सहपत्र

**(रक्कम रु. कोटीत)**

| अ. क्र. | प्रकल्प/यंत्रणेचे नाव | मंजूर वर्ष | राकृवियो अंतर्गत मंजूर प्रकल्प किंमत | मार्च २०२३ अखेर पर्यंत वितरीत निधी | सन २०२३-२४ करीता शिल्लक प्रकल्प मूल्य | या शासन निर्णयान्वये निधी वितरण | | | वितरणानंतर शिल्लक प्रकल्प मूल्य |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | अ.जाती | अ.जमाती | एकूण | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ८ | ९ | १० | ११ |
| १ | डॉ. पीडीकेव्ही अकोला येथे भुईमूग करडई व सूर्यपूल या पिकांचे पैदासकार व प्रमाणित बीज उत्पादन केंद्राची स्थापना करणे | २०२१-२२ | १.८१ | ०.०३ | १.७८ | ०.३२ | ०.१५१२ | ०.४७१२ | १.०३०८ |
| ४ | कृषि यांत्रिकीकरण प्रकल्प | २०२१-२२ | १४२.५४ | १४१.०१ | १.५३२० | १.२३२० | ०.३० | १.५३२० | ०.०० |
| ५ | कृषि यांत्रिकीकरण प्रकल्प | २०२२-२३ | १५० | १२२ | २८ | ०.०० | ०.५० | ०.५० | २७.५० |
| | **एकूण** | | **२९४.३५** | **२६३.०४** | **३१.५१** | **१.५५२०** | **०.९५१२** | **२.५०३२** | **२८.५३१** |